आठव्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीत उभारावयाच्या सहकारी सूत गिरण्यांना शासकीय भागभांडवल मंजूर करण्याबाबत. श्री केदारलिंग वारणा सहकारी सूतगिरणी मर्या., आसुर्ले-पोर्ले, ता.पन्हाळा, जि.कोल्हापूर.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शाभाभा १११५/प्र.क्र.६१/टेक्स-१ (अ)**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २३ जून, २०१५.

**प्रस्तावना -**

आठव्या पंचवार्षिक योजनेच्या कालावधीत उभारावयाच्या शासकीय अर्थसहाय्यासाठी निवडलेल्या सहकारी सूत गिरण्यांच्या प्रकरणी गिरण्यांनी शासनाकडे सादर केलेल्या प्रकल्पांना अर्थसहाय्य करण्यासाठी कर्जे व भागभांडवलाचे प्रमाण १:१ ठेवून सभासद भागभांडवलाच्या १:९ प्रमाणात शासकीय भागभांडवल देण्यासाठी शासनाने मान्यता दिलेली आहे. गिरण्यांनी शासनास सादर केलेल्या प्रकल्प अहवालाच्या अनुषंगाने प्रकल्प उभारणीच्या कामात केलेली प्रगती लक्षात घेऊन, तसेच, आतापर्यंत सभासदांकडून जमा केलेले भागभांडवल लक्षात घेऊन, श्री केदारलिंग वारणा सहकारी सूतगिरणी मर्या., आसुर्ले-पोर्ले, ता.पन्हाळा, जि.कोल्हापूर या सूत गिरणीस सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षात शासकीय भागभांडवल उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय -**

शासनाने श्री केदारलिंग वारणा सहकारी सूतगिरणी मर्या., आसुर्ले-पोर्ले, ता.पन्हाळा, जि.कोल्हापूर या गिरणीच्या रु.६१००.०० लाख इतक्या प्रकल्प अहवाल किंमतीस मंजुरी दिलेली आहे. सदर सूतगिरणीने रु.२६७.८६ लाख इतके सभासद भागभांडवल जमा केले असून त्यानुसार शासकीय भागभांडवल रु.२४१०.७४ लाख इतके देय्य आहे. त्यापैकी रु.४२५.०० लाख इतके शासकीय भागभांडवल गिरणीस यापुर्वी वितरीत केले आहे. त्याबाबतचे विवरणपत्र-अ सोबत जोडले आहे. सर्वसाधारण सहकारी सूतगिरण्यांना शासकीय भागभांडवल मंजुर करण्यासाठी सन २०१५-१६ मध्ये अर्थसंकल्पिय अंदाजान्वये प्राप्त तरतूद रुपये २८,००,००,०००/- (रुपये अठ्ठावीस कोटी फक्त) पैकी श्री केदारलिंग वारणा सहकारी सूतगिरणी मर्या., आसुर्ले-पोर्ले, ता.पन्हाळा, जि.कोल्हापूर (SHREE KEDARLING WARANA SAHAKARI SOOT GIRNI LTD., ASURLE-PORLE, DIST.KOLHAPUR) या सूत गिरणीस रु.१०,००,००,०००/- (रुपये दहा कोटी फक्त) इतकी रक्कम शासकीय भाग भांडवल म्हणून मंजूर करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. सदर शासकीय भागभांडवल शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक-सूतगि ११९७/प्र.क्र.१९३/टेक्स-१, दिनांक २४.३.१९९९ अन्वये नमूद केलेल्या तसेच, शासकीय भागभांडवलासाठी शासनाने भविष्यात आणखी काही अटी व शर्ती निश्चित केल्यास अशा अतिरिक्त अटी व शर्तीच्या अधीन राहून तसेच खालील अटींच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

अ) प्रस्तुत सूत गिरणीकडून शासन निर्णय दिनांक११/८/१९९३ व दिनांक २४/३/१९९९ मधील अटी शर्तीचे पालन होत आहे या बाबतची संचालक वस्त्रोद्योग यांनी खात्री करावी.

ब) सदर सूत गिरणीच्या कामकाजावर व प्रकल्प उभारणीवर लक्ष देऊन त्याबाबतच्या प्रगतीचा तिमाही अहवाल विहित विवरणपत्रात शासनास संचालक वस्त्रोद्योग यांनी सादर करावा.

क) प्रस्तुत गिरणी उत्पादनाखाली आल्यानंतर शासन निर्णयामधील तरतूदीनुसार वसुलीबाबत काटेकोरपणे कार्यवाही संचालक वस्त्रोद्योग यांनी करावी.

ड) सदर सूत गिरणीस प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे रु.१०००.०० लाख इतके शासकीय भागभांडवल वितरीत करण्यात येत आहे. प्रस्तुत वितरीत होणाऱ्या रक्कमेच्या २०% इतक्या वैयक्तिक मत्तेचे तारण म्हणून पुढील ३महिन्यात विद्यमान संचालक मंडळाकडून संचालक वस्त्रोद्योग यांनी मिळवून घ्यावे .तसेच सदर सूत गिरणीच्या विद्यमान संचालकांच्या वैयक्तिक मालमत्तेचे तारण प्राप्त होणार नाही, तोपर्यंत प्रस्तुत निधी गिरणीस खर्च करता येणार नाही. अशा प्रकारे बँकेवर बंधन संचालक वस्त्रोद्योग यांनी आणावे .

इ) प्रस्तुत सूत गिरणीच्या संचालक मंडळाची निवडणूक झाल्यास संचालक मंडळास ३महिन्याचे आत सदर सूत गिरणीस मंजूर करण्यात येत असलेल्या प्रस्तुत शासकीय भागभांडवलाच्या अनुषंगाने वैयक्तिक मालमत्ता तारण दयावे लागेल तसेच नव्याने नियुक्त संचालक मंडळाने असे तारण दिल्यानंतर पुर्वीच्या संचालक मंडळाचे तारण मुक्त करता येईल अशी सुधारणा संस्थेच्या Bye Laws मध्ये करण्याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी

ई) सूत गिरणीच्या प्रकल्पाला मान्यता दिल्यानंतर प्रकल्पाची Financial Closer चा पुरावा शासनास सादर केल्याशिवाय शासनाचा हिस्सा देता येणार नाही, याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी खात्री करुन तशी कार्यवाही करावी.

उ) प्रस्तुत सूत गिरणीकडे बँकेत जमा असलेल्या निधीचे नियोजन करुन कार्यक्षमतेने विनियोग करत असल्याची संचालक वस्त्रोद्योग यांनी खात्री करावी.

ऊ) प्रस्तुत सूतगिरणीने कर्जाची उचल करुन त्याचा विनियोग प्रकल्प उभारणीसाठी करुन लवकर प्रकल्प पूर्ण करावा. याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी नियंत्रण ठेवावे.

अं) सदर सूत गिरणीने सन ९८-१९९७ व्यवहारात आलेला वाढावा वाटप करतांना त्याची प्रती भाग रु.१५० -/प्रमाणे शासनाच्या शेअर अनामत खाती १महिन्याच्या आत जमा करावी ,या अटीवर सदर शासकीय भागभांडवल मंजूर करण्यात येत आहे .याबाबत संचालक वस्त्रोद्योग यांनी तशी कार्यवाही करावी.

शासकीय भाग भांडवलाची परतफेड विहित वेळेत गिरणीमार्फत होईल यासाठी आवश्यक असलेली सर्व दक्षता संचालक, वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी घ्यावी.

३. या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेली शासकीय भागभांडवलाची रक्कम रु.१०,००,००,०००/- (रुपये दहा कोटी फक्त) सदर सूतगिरणी संदर्भात संचालक, वस्त्रोद्योग यांचे कडून प्राप्त झालेले बँक खाते,

बँक ऑफ इंडिया, शाखा अमृत नगर, ता.पन्हाळा, जि.कोल्हापूर खाते क्रमांक ०९२५२०११०००००९१ मध्ये RTGS द्वारे जमा करावी. गिरण्यांनी प्रकल्प पूर्ण करण्यासाठी, कराव्या लागणाऱ्या खर्चासंदर्भात शासन निर्णय क्रमांक सूतगि १२००/११७१३/प्र.क्र.४२६/टेक्स-१ (अ), दिनांक १५.६.२००६ अन्वये स्थापन केलेल्या संबंधीत सनियंत्रण समित्यांची मान्यता घ्यावी. गिरणीच्या संचालक मंडळाने गिरणीच्या खर्चावर कडक नियंत्रण ठेवावे व अनावश्यक खर्च टाळावा.

४. या सूतगिरणीस मिळालेले अर्थसहाय्य संबंधित प्रकल्प पूर्ण करण्यासाठीच उपयोगात आणणे संस्थेवर बंधनकारक राहील. या अर्थसहाय्याचा दुरुपयोग केल्यास, संस्थेच्या संचालक मंडळावर कायदेशीर कार्यवाही करण्यात येईल व संस्थेला दिलेले अर्थसहाय्य एक रकमी वसूल करण्यात येईल. तसेच, अशा प्रकरणी संबंधित संचालक मंडळास व्यक्तिश: जबाबदार धरण्यात येईल. त्यामुळे गिरणीच्या संचालक मंडळाने गिरणीच्या खर्चावर कडक नियंत्रण ठेवावे व अनावश्यक खर्च टाळावा.

५. वित्त विभाग परीपत्रक क्र.अर्थसं/२०१५ प्र.क्र.८५/अर्थ-३ ,दि.१७/४/२०१५ अन्वये ३२ अंशदाने या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परीपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पुर्तता होत आहे.

६. श्री केदारलिंग वारणा सहकारी सूतगिरणी मर्या., आसुर्ले-पोर्ले, ता.पन्हाळा, जि.कोल्हापूर (SHREE KEDARLING WARANA SAHAKARI SOOT GIRNI LTD., ASURLE-PORLE, DIST.KOLHAPUR) या सूतगिरणीस या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या रु.१०,००,००,०००/- (रुपये दहा कोटी फक्त) इतक्या भागभांडवलाचा खर्च "मागणी क्रमांक - व्ही-३, ४४२५-सहकारावरील भांडवली खर्च (१९०) -सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना -(००) (०५) सहकारी सूत कताई गिरण्यांना भाग भांडवली अंशदान (४४२५ ०३३८), ३२ अंशदाने" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षात उपलब्ध झालेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

७. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली रु.१०,००,००,०००/- (रुपये दहा कोटी फक्त) इतकी रक्कम श्री केदारलिंग वारणा सहकारी सूतगिरणी मर्या., आसुर्ले-पोर्ले, ता.पन्हाळा, जि.कोल्हापूर (SHREE KEDARLING WARANA SAHAKARI SOOT GIRNI LTD., ASURLE-PORLE, DIST.KOLHAPUR) या सूतगिरणीच्या बँक ऑफ इंडिया, शाखा अमृत नगर, ता.पन्हाळा, जि.कोल्हापूर खाते क्रमांक ०९२५२०११०००००९१ या नावाने अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरीत करुन प्रस्तुत सूत गिरणीच्या बँक ऑफ इंडिया, शाखा अमृत नगर, ता.पन्हाळा, जि.कोल्हापूर खाते क्रमांक ०९२५२०११०००००९१मध्ये RTGS द्वारे निधी वितरीत करण्याची कार्यवाही करण्याकरीता श्रीमती अ. म. जोशी, कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, श्री. दा. अ. कुलकर्णी, उप सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय विस्तार, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यास अनुसरुन सदर सहकारी सूतगिरणीस शासकीय भाग भांडवलाची रक्कम RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

८. हा शासन निर्णय वित्त विभागाचे परीपत्रक क्र.अर्थसं/२०१५ प्र.क्र.८५/अर्थ-३ ,दि.१७/४/२०१५ अन्वये विभागास प्राप्त झालेल्या अधिकारान्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१०१५१३१०४६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anilkumar Ramdaspant Ugle

Digitally signed by Anilkumar Ramdaspant Ugle
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Anilkumar Ramdaspant Ugle
Date: 2015.07.10 15:15:18 +05'30'

**(अनिलकुमार रा. उगले)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन,

**प्रत,**

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर,
२) महालेखापाल, (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर,
३) अ.मु.स. (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक,
४) कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (४ प्रतींसह)
५) कार्यासन अधिकारी, १६-सी, १७-सी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
६) वित्त विभाग, व्यय-२ / अर्थसंकल्प-१३, मंत्रालय, मुंबई-३२,
७) नियोजन विभाग, कार्यासन-१४३१, मंत्रालय, मुंबई-३२,
८) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
९) संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय,महाराष्ट्र राज्य, नागपूर,
१०) प्रादेशिक उपसंचालक, वस्त्रोद्योग, सोलापूर,
११) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, कोल्हापूर,
१२) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१४) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती),
१५) सरव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या., मुंबई-२३,
१६) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्यादित, वकील हाऊस, मुंबई-१,
१७) चेअरमन, श्री केदारलिंग वारणा सहकारी सूतगिरणी मर्या., आसुर्ले-पोर्ले, ता.पन्हाळा, जि.कोल्हापूर
१८) निवडनस्ती (टेक्स १ अ / ब)

**सहपत्र : शाभाभा १११५/प्र.क्र.६१/टेक्स १ (अ), दिनांक २३ जून, २०१५.**

**विवरण पत्र "अ"**

श्री केदारलिंग वारणा सहकारी सूतगिरणी मर्या., आसुर्ले-पोर्ले, ता.पन्हाळा, जि.कोल्हापूर

| अ.क्र. | शासन आदेश क्रमांक व दिनांक | रक्कम (रुपये लाखात) |
|---|---|---|
| १ | सूतगि १२९५/प्र.क्र.३३६/टेक्स १, दि.१६/१/१९९६ | १००.०० |
| २ | सूतगि १२९६/प्र.क्र.४१२/टेक्स १, दि.३१/३/१९९७ | १००.०० |
| ३ | सूतगि ११०९/प्र.क्र.७०/टेक्स १ (अ), दि.३१/३/२०१० | २५.०० |
| ४ | सूतगि १११०/प्र.क्र.७० (३)/टेक्स १ (ब), दि.३१/३/२०११ | २००.०० |
| | **एकूण** | **४२५.००** |